वन विभागाच्या क्षेत्रिय कार्यालयातील "आहरण व संवितरण अधिकारी" यांच्या पदनामात बदल करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम २०१५/प्र.क्र.२८३/फ-२**
**हूतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक :- ०२ नोव्हेंबर, २०१५**

वाचा :- १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-मकोनि-१०००/प्र.क्र.४४/०५,कोषा-प्र.५, दि. ०४.०१.२००६

२) महसूल व वन विभाग शासन निर्णय, क्र.एफडीएम-२०१३/प्र.क्र.४५/फ-२, दि. २१.१०.२०१३

३) महसूल व वन विभाग अधिसूचना क्र.आयएफएस-२०१३/३५/प्र.क्र.२१/फ-७, दि.०५.०९.२०१३

४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-९/ भावसे/प्र.क्र.६० (११-१२)/९९२/१२-१६, दि.२३.१०.२०१५.

५) मुख्य वनसंरक्षक आणि वनसंवर्धनतज्ञ पुणे यांचे पत्र क्र.जा.क्र. कक्ष-४/आस्था / प्र.क्र.२८९/५९३/२०१५-१६ , दि.२३.१०.२०१५.

**प्रस्तावना -**

शासनाच्या वन विभागाच्या क्षेत्रिय कार्यालयातील कर्मचाऱ्यांची वेतन व भत्यांची देयके फेब्रुवारी-२००६ पासून इतर विभागाच्या कर्मचाऱ्यांप्रमाणेच कोषागारातून पारित करण्याबाबत वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.०४.०१.२००६ च्या शासन निर्णयान्वये निर्णय घेण्यात आला आहे. यानुसार महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ खंड-१ मधील नियम १३ नुसार व नियम १५(३) नुसार विभागातील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांची यादी महालेखापाल कार्यालयाकडे पाठविण्यात येते. यानुसार वेळोवेळी निर्गमीत केलेल्या शासन निर्णयानुसार विभागातील आहरण व संवितरण आधिकाऱ्यांच्या याद्या प्रसिध्द करण्यात आल्या आहेत.

२. महसूल व वन विभागाच्या संदर्भ क्र. ३ येथील अधिसूचनेन्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे आणि मुख्य वनसंरक्षक आणि वनसंवर्धन तज्ञ, पुणे यांचे पदामध्ये श्रेणीवाढ होऊन त्यांची पदनामे अनुक्रमे प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक आणि वनसंवर्धन तज्ञ, पुणे अशी झालेली होती. परंतू अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक आणि वनसंवर्धनतज्ञ पुणे या पदास केंद्र शासनाची पुढील तीन वर्षाची मान्यता प्राप्त न झाल्याने सदरचे पद दि.०१.१०.२०१५ पासून मुख्य वनसंरक्षक या श्रेणीत अस्तित्वात राहील असे केंद्र शासनाच्या दि.१८.०९.२०१५ च्या पत्रान्वये कळविण्यात आले आहे. त्याअनुषंगाने अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), महाराष्ट्र राज्य,नागपूर व मुख्य वनसंरक्षक आणि वनसंवर्धनतज्ञ, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याचे

प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.४ वरील दि.२३.१०.२०१५ च्या पत्रान्वये शासनास मान्यतेसाठी सादर केलेला आहे.

३. संदर्भ क्र. ४ वरील अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने मुख्य वनसंरक्षक आणि वनसंवर्धनतज्ञ, पुणे यांचे पदनामात बदल करुन त्यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या संदर्भ क्र.४ वरील दि. २३.१०.२०१५ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन मुख्य वनसंरक्षक आणि वनसंवर्धन तज्ञ, पुणे यांना खालील प्रमाणे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे:-

| वनवृत्त | पुर्वीच्या यादीत आहरण व संवितरण अधिका-यांचे पदनाम | या शासन निर्णयान्वये घोषित करावयाचे आहरण व संवितरण अधिकऱ्यांचे सुधारीत पदनाम | मुख्यालय | जवळचे कोषागार/ उपकोषागार कार्यालय, कोषागार संकेतांक व आहरण व संवितरण अधिकारी संकेतांक क्रमांक |
|---|---|---|---|---|
| मुख्य वनसंरक्षक आणि वनसंवर्धन तज्ञ, पुणे | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक आणि वनसंवर्धन तज्ञ, पुणे | मुख्य वनसंरक्षक आणि वनसंवर्धन तज्ञ, पुणे | पुणे | कोषागार - पुणे<br>कोषागार संकेतांक - २२०१<br>आहरण व संवितरण अधिकारी संकेतांक - ००१११९ |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेतांक २०१५११०२१२२८००४६१९ असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.11.02 12:30:02 +05'30'

**(डी.एल.थोरात)**
सह सचिव
महसूल व वन विभाग

**प्रति -**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे

३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर.

४. मुख्य वनसंरक्षक आणि वनसंवर्धन तज्ञ, पुणे

५. महालेखापाल (लेखा परीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/ नागपूर (त्यांना विनंती करण्यात येते कि, महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ खंड-१ मधील नियम १५(२) व १५ (३) नुसार उपरोक्त अधिकाऱ्यास प्राधिकृत करण्याची पुढील कार्यवाही करण्यात करावी)

६. संचालक, लेखा व कोषागार, संचालनालय, मुंबई.

७. वरीष्ठ लेखा कोषागार अधिकारी, नागपूर / मुंबई

८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

९. सहसंचालक, (तांत्रिक) लेखा व कोषागार, मुंबई

१०. वित्त विभाग, कार्यासन कोषा. प्र-५, मंत्रालय, मुंबई.

११. निवड नस्ती (फ-२), महसूल व वन विभाग.